दि.०१/०१/२००१ रोजी किंवा त्या नंतर निवड प्रक्रिया सुरु होणा-या पदांवरील नियुक्तीसाठी गट अ, गट ब. व गट क मधील शासकीय अधिकारी/कर्मचा-यासाठी संगणक ज्ञान विषयक अर्हता निश्चित करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ७ ऑगस्ट, २००१

वाचावे:-

१) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र. सेप्रनि १०९८/प्र.क्र.७/९८/१२. दि. २५.१.१९९९

२)सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.सेप्रनि १०९८/प्र.क्र.७/९८/१२. दि. ३.५.२०००

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण १०००/प्र.क्र.१३३/३९. दि. १०.७.२०००

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.सेप्रनि१०९८/प्र.क्र.७/९८/१२. दि. २५ जानेवारी, १९९९ अन्वये "महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९" अधिसूचित करण्यात आलेले आहेत. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.से.प्र.नि. १०९८/प्र.क्र.७/९८/बारा, दि. ३.५.२००० अन्वये वरील विनियमांना दि. १ जानेवारी, २००१ पासून प्रभाव देण्यात आलेला आहे. सदर नियमातील नियम ३ अनुसार शासनाच्या विभाग/कार्यालयातील गट अ, गट ब, व गट क मधील पदांवर नियुक्ती करण्यासंबंधात अस्तित्वात असलेले नियम, आदेश किंवा अनुदेश यामध्ये काही तरतुद नसेल तर शासन वेळोवेळी आदेश काढून निश्चित करेल असे संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान, शासन सेवेतील गट अ, गट ब, व गट क या पदांवर नियुक्ती करीता एक अतिरिक्त आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आलेले आहेत. तसेच सदर नियमातील नियम २ व नियम ४ अनुसार संगणक

हाताळणी/वापराबाबतचे शासन मान्यता प्राप्त प्रमाणपत्र दि. ३१/१२/२००२ पर्यंत सादर करण्याचे आवश्यक करण्यात आलेले आहे. त्यानुसार दि. १.१.२००१ रोजी किंवा त्यानंतर गट अ, गट ब, व गट क या मधील ज्या पदाची निवड प्रक्रिया सुरु होईल त्यांच्यासाठी संगणक विषयक कोणती अर्हता असावी तसेच जे कर्मचारी/अधिकारी दि. १.१.२००१ रोजी सेवेत असतील किंवा १.१.२००१ पूर्वी ज्यांची निवड प्रक्रिया सुरु झाली असेल त्यांनी कोणते प्रमाणपत्र सादर करावे याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) शासनाच्या गट अ, गट ब, व गट क मधील (वाहन चालक वगळून) ज्या पदांची निवड प्रक्रीया दि. १.१.२००१ रोजी किंवा नंतर सुरु होईल त्या पदावरील नियुक्तीसाठी महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ च्या नियम ३ अन्वये आवश्यक अर्हता म्हणून संबंधित उमेदवारांनी खालीलपैकी प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत 'C.C.C.' किंवा 'O' स्तर किंवा 'A' स्तर किंवा 'B' स्तर किंवा 'C' स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.

किंवा

ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे कडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाण पत्र.

२) महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ च्या नियम २ व नियम ४ अन्वये दि. १.१.२००१ रोजी शासकीय सेवेत असलेल्या किंवा दि. १.१.२००१ पूर्वी ज्यांची निवड प्रक्रीया सुरु झाली असेल असे अधिकारी/कर्मचाऱ्यांना सुध्दा वरील प्रमाणे विहीत कालावधीत प्रमाणपत्र सादर करावे लागेल.

३) दि. १० जुलै २००० पूर्वी संगणक प्रशिक्षण पूर्ण केलेले किंवा प्रशिक्षणासाठी प्रवेश घेतलेले शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण १०००/प्र.क्र.१३३/३९, दिनांक १०.७.२००० मधील तरतूदी लागू राहतील.

सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागानी या निर्णयानुसार आवश्यक ती पुढील कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

डॉ. रमेशचंद्र सागर
संचालक तथा सह सचिव

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव
उपमुख्य मंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय (विधानसभा), मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय (विधान परिषद), मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार कार्यालये
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
निवड नस्ती (दोन प्रती)

--------

एच-563(4500-8-01)2. GR-20020415123126000-0104

C:\lotus\work\wordpro/Atak